# कायूम तांग्रीकुलीयेव

# धनगराचा

अनुवाद : अनिल हवालदार

चित्रे : एदुआर्द झान्यास्की



प्रगती प्रकाशन, मॉस्को



## धनगराचा कुत्रा

तो धनगर त्या वाळवंटात एकटाच उभा होता. त्याचा मदतनीस शेजारच्या खेड्यातून खाण्या-पिण्याच्या वस्तूंचा साठा आणायला गेला होता. जोपर्यंत त्या म्हाताऱ्या कझाख धनगरापाशी त्याची विश्वासू बंदूक होती आणि इमानी कुत्रा होता, तोपर्यंत त्याला वाळवंटाची भीती वाटत नव्हती. लांडग्यांच्या कोणत्याही हल्ल्याला त्यांनी परतवून लावले असते.

आपल्या वाकड्या काठीवर रेलून तो धनगर विचार करीत उभा होता, तोच टेकडीपलिकडे वेटोळेदार धुराचा लोट त्याच्या नजरेला पडला. जणू एखादा प्रचंड राक्षस चिलीम ओढत असावा असे त्या धुराच्या लोटाकडे पाहून वाटत होते.

"सकाळी धुळीचं वादळ होणार, धनगराचा इशारा खरा ठरणार," काहीसा चिंताक्रांत होत तो स्वतःशी म्हणाला.

मुळीच वेळ न गमावता त्याने आपल्या मेंढ्यांच्या कळपाला वाऱ्याच्या झोतांपासून दूर, टेकडीच्या निवाऱ्याला नेले. दरम्यान त्याचा कुत्रा मेंढ्यांना ताब्यात राखायला मागेपुढे धावत होता. एकदा का मेंढ्यांमध्ये घबराट माजली की, त्यांना आवरणे कठीण जाते. त्या मुंड्या जमिनीला टेकवून वाऱ्याबरोबर चारी दिशांना भरकटत जातात.

दिमाखदार उंटाचे तसे नसते. ऐन वादळात तो ताठ मानेने धीराने वाटचाल करत असतो.

लौकरच ते वाळूचे वादळ त्या धनगरापर्यंत आणि त्याच्या मेंढ्यांपर्यंत पोचले. वारा घोंघावत होता, काळोख पसरला होता, धुळीने सूर्याला झाकून टाकले होते आणि धनगराला दोन पावलांवरची वाटसुद्धा दिसेनाशी झाली होती.

वादळ सूं सूं भणाणत होते तेव्हा आपल्या भल्या मोठ्या झग्यात स्वतःला गरफटून घेऊन तो धनगर मेंढ्यांच्या कळपाशी मुकाट बसून होता. आकाशात विजांचा कडकडाट वाजत होता,

मेंढ्या घाबरून वाळवंटात सैरावैरा धावत होत्या. धनगराने त्यांच्या मागे धावायचा प्रयत्न केला, पण जोरदार वाऱ्यांनी त्याला क्षणात भुईसपाट पाडले. त्याच्या नाका-तोंडात, डोळ्यात आणि कानात वाळूच वाळू भरली. वाळूचे कण त्याच्या दातांमध्ये चरचरा रगडले जाऊ लागले. वादळ संपेपर्यंत मुकाट पडून राहण्याशिवाय दुसरा उपाय नव्हता. त्या अंधारात आंधळ्याप्रमाणे चाचपडत फिरणे त्याला शक्य नव्हते.

सकाळच्या सुमाराला वाऱ्याचा जोर कमी झाला आणि आपल्या वाळूच्या आडोशामधून तो धनगर सरपटत बाहेर आला. पण त्याने भोवती नजर टाकली तेव्हा तिथे कुणाचाच पत्ता नव्हता – ना त्याच्या मेंढ्यांचा ना कुत्र्याचा! जणू वादळाने त्यांना गिळून टाकले होते.

वाळवंट धुंडाळीत असताना त्या धनगराला एक छोटी पितळेची वस्तू सापडली. मेंढ्यांच्या कळपाचा, पुढारी असलेल्या म्हाताऱ्या बकऱ्याच्या गळ्यातली ती घंटा होती. त्या सेर्का नांवाच्या म्हाताऱ्या बकऱ्याच्या गळ्यातली घंटा हरवली होती याचा अर्थ पुढे दुर्दैव वाढून ठेवलेले होते. कारण त्या घंटीचा आवाज अनेक मैलपर्यंत ऐकू येत असे आणि त्या आवाजाच्या दिशेने धनगराला आपल्या कळपाला हुडकून काढता येत असे. आता तो आपल्या मेंढ्या कशा शोधणार? गवताच्या गंजीमधून सुई हुडकून काढण्याइतकेच ते काम अवघड होते...

लगबगीने तो धनगर खेड्यात परत आला आणि लोकांना गोळा करून मेंढ्या शोधायला चार दिवस व चार रात्री त्यांनी वाळवंट पालथे घातले... अखेर पाचव्या दिवशी त्यांना शोध लागला! त्या मेंढ्या कुठे होत्या ठाऊक आहे? कुरणापासून तब्बल दोनशे मैल दूर!

एका विनवापरातल्या पाण्याच्या विहीरीपाशी कळप शांतपणे चरत होता. सर्व मेंढे आणि मेंढ्या सुखरूप होत्या. आणि त्याचे श्रेय त्या इमानी कुत्र्याला होते. गेले पाच दिवस तो कुत्रा भूक आणि तहान सहन करीत होता. पण त्याने त्या मेंढ्यांपासून आपली जागा सोडली नव्हती व आपल्या मालकाची वाट पहात तो मेंढ्यांची राखण करीत राहिला.





## अक्‌बाय

आता मी तुम्हाला अक्‌बाय नांवाच्या वाळवंटातल्या आणखी एका कुत्र्याची गोष्ट सांगणार आहे. वाळूच्या टेकड्यांमध्येच, आपल्या मालकाच्या मेंढ्यांची राखण करीत तो लहानाचा मोठा झाला. वाळवंटातल्या लांडग्यांना त्याची मोठी धास्ती बसली होती. शूर अक्‌बायला कुणीही जोड नव्हते.

काहीवेळा लांडग्यांच्या कळपाची धूर्त पुढारीण आपल्या दोन टोळ्या बनवायची. छोट्या टोळीला ती राखणदार कुत्र्यावर सरळ सरळ हल्ला करायला पाठवायची आणि त्याचवेळी लांडग्यांची मोठी टोळी तिच्या पुढारीपणाखाली मेंढ्यांच्या कळपाच्या पिछाडीकडून धाड घालायची. अशा पद्धतीने लांडग्यांचा कळप अनेक मेंढ्यांना ठार मारायचा आणि आपली लूट पळवायचा.

पण अनुभवी अक्‌बायला लांडग्यांच्या युक्त्या माहीत झाल्या होत्या. आणि त्याला आपल्या मेंढ्याही माहीत होत्या. कोणतीही युक्ती त्याला त्याच्या जागेपासून ढळवू शकत नव्हती.

परंतु आता हा धनगरी कुत्रा म्हातारा होत चालला होता. लौकरच अशी वेळ येऊन ठेपली की, त्याच्या मालकाला नाइलाजाने त्याला खेड्यात परत पाठवणे भाग पडले. या म्हाताऱ्या कुत्र्याने आपले आयुष्यातले अखेरचे दिवस निवांतपणे झाडांच्या थंडगार सावलीत, मऊ मऊ गवतावर बसून काढावेत अशी त्याच्या मालकाची इच्छा होती.

वाळवंटात जायला निघण्यापूर्वी त्या कुत्र्याच्या मालकाने – चारी आजोबाने – अक्‌बायला साखळीने बांधले आणि कमीत कमी एक दिवस त्याला मोकळा सोडू नये असा हुकूम दिला. म्हणजे तो धनगर खूप दूर अंतरापर्यंत गेला असता आणि त्याचा पाठलाग करीत जाणे कुत्र्याला शक्य झाले नसते. साहजिकच सबंध दिवसभर आणि अर्ध्या रात्रीपर्यंत म्हातारा अक्‌बाय भुंकत राहिला आणि साखळीला हिसके देत राहिला. ज्या क्षणी त्याला साखळीपासून मोकळे करण्यात आले, त्या क्षणाला पुढ्यातल्या थाळीतल्या खाण्याच्या पदार्थांकडे ढुंकूनही न पाहता त्याने

वाळवंटाच्या दिशेने धाव घेतली. त्याच्या आयुष्यातला तो अत्यंत खडतर प्रवास होता. रणरणत्या वाळवंटामधून पाण्याविना किंवा सोबतीच्या मदतीविना त्याला दोनशे मैलांहून जास्त अंतर काटायचे होते.

अखेरीस तो कुरणाजवळ पोचला तेव्हा थंडगार पाण्याशेजारी अक्बाय थकून कोसळला आणि घटघटा घटघटा पाणी पीत राहिला... मग थकलेली मुंडी खाली झुकवून तो खरडत खरडत आपल्या घराशी विश्रांतीला गेला. पण त्यापूर्वी त्याने नव्या तरुण राखणदार कुत्र्याला तेथून दूर हाकलले.

आपल्या जुन्या मित्राला पाहताच चारी आजोबांना डोळ्यातले अश्रू आवरणे कठीण झाले. ते अक्बायजवळ गेले, त्याच्या शेजारी बसले आणि हळुवारपणे त्याचा कान खाजवीत त्यांनी पुटपुटत क्षमा मागितली.

आपल्या मालकाची जणू हजेरी घ्यावी अशा तऱ्हेने म्हातारा अक्बाय प्रथम तक्रारीच्या सुरात केकाटला, पण लौकरच त्याचे शेपूट हलू लागले. त्याचे स्वागत केल्याबद्दलचा व तो पुन्हा तेथे हवा होता हे समजल्याचा आनंद, हलणारे शेपूट दाखवीत होते.





## गुपित

एकदा मी चारी-आगा आणि अक्बाय यांच्या भेटीला त्यांच्या वाळवंटातल्या मुक्कामी गेलो होतो. म्हाताऱ्या धनगराने मला थोडे खायला दिले आणि मडके भरून ताजा हिरव्या पत्तीचा चहा दिला. मग मला म्हणाले :

"माझ्या पोरा, जर तुला धनगर व्हायचं असेल तर कामाचा अनुभव घेतला पाहिजे. दिसायला हा मेंढ्या राखायचा धंदा सोपा असला, तरी तो शिकायला आयुष्य पुरत नाही, हे माझे शब्द लक्षात ठेव. तेव्हा मी तुला पहिला धडा शिकवतो. तो उंट पाहिलास? त्याच्या पाठीवर मी दोन बुधले लटकावले आहेत. त्या उंटाला विहीरीपर्यंत घेऊन जा आणि पोरा, माझ्यासाठी तेवढं पाणी भरून घेऊन ये. ते पाणी चहाला खूप ताजं असतं.

"पण एक गोष्ट सांगतो. वाटेत जर तुझ्या उंटानं गवत चरायला किंवा आडवाटेला भटकायला सुरुवात केली, तर त्याला तसं करूं दे. त्याला मारू नको आणि त्याच्यावरून खाली उतरू नको. सोबतीला अक्बायला घेऊन जाऊ शकतोस."

तर असे आम्ही तिघे निघालो : अक्बाय, उंट आणि मी.

मी चाललो, चाललो, पण विहीरीचा पत्ता नव्हता. पुढे मला नंतर समजले की, ती विहीर जवळजवळ बारा मैल अंतरावर होती. मुलाच्या दृष्टीने हे अंतर कमी नव्हते. माझा उंट रमतगमत चालला होता, गवत चघळत होता, सगळ्या वाळूच्या टेकड्यांना वळसे घालत होता. हा सर्व वेळ अक्बाय बिळातल्या उंदरांचा पाठलाग करीत होता आणि सशांची घाबरगुंडी उडवीत होता.

काही वेळानंतर आम्हाला एक म्हातारा वाटसरू भेटला.

"ए पोरा," त्याने हाक मारली, "अशा वेळेला कुठं चाललायस? लौकरच अंधार पडेल."

मी माझ्या कामगिरीची त्याला माहिती दिली तेव्हा तो ओरडला.

"काय ? संध्याकाळची वेळ जवळ आली असताना वाळवंटात जाण्याचा धोका पत्करतोस ? तशी विहीर फारशी लांब नाही म्हणा !"

असे म्हणून त्याने माझ्या उंटाचा लगाम हाती पकडला. आम्हाला मागे वळवण्याचा त्याचा इरादा होता. पण अक्बायने अचानक त्याची विजार मागल्या बाजूने तोंडात पकडली.

"अक्बाय, सोड त्याला," मी रागाने ओरडलो.

पण त्या हट्टी कुत्र्याने माझे मुळीच ऐकले नाही; जेव्हा वाटसरूने लगाम सोडून दिला तेव्हाच अक्बायने त्याची विजार सोडली.

जणू काही घडलेच नाही अशा थाटात आमची उंटाची स्वारी पुढे निघाली.



"त्याला जोरात पिटाळ" म्हातारा वाटसरू ओरडला. "लौकरच रात्र पडेल ; तू वाळवंटात रस्ता चुकशील."

"मी माझ्याकडून जास्तीत जास्त प्रयत्न करतो," मी उत्तरादाखल ओरडलो. पण प्रत्यक्षात मात्र चारी आजोबांच्या आज्ञा मी पाळल्या. उंटाला मारायचे नाही आणि उंटावरून खाली उतरायचे नाही.

अशा रीतीने मी माझा शब्द पाळला आणि उंटाला मनमोकळे चालू दिले. आणि आनंदाची बाब म्हणजे आम्ही लौकरच विहीरीजवळ पोचलो. वाळवंटातल्या पाणथळ जागेच्या आम्ही जवळ पोचलो तसे चारी बाजूंनी कुत्री भुंकत आमच्या अंगावर चालून आली. पण आमचा वास ओळखताच, जणू जुन्या मित्रांचे स्वागत करावे त्याप्रमाणे त्यांनी आपल्या शेपट्या हलवायला सुरुवात केली. कुत्र्यांपाठोपाठ एक मुलगा तेथे आला. माझ्यापेक्षा तो सुमारे पाच वर्षांनी मोठा असावा. अर्थात मी माझ्या उंटावर मोठ्या दिमाखात बसून राहिलो होतो. जणू त्याला दाखवून देत होतो — "माझ्याकडं वर पहा. मी वाळवंट ओलांडून आलोय, माहीत आहे?"

त्याने किंचित ताठपणेच मान झुकवली आणि माझ्या उंटाला गुडघ्यांवर खाली बसवले. आमचे बुधले पाण्याने भरले आणि हाताने झटकून निरोप दिला. जणू मी म्हणजे उंटाच्या पाठीवरची एक क्षुल्लक माशी होतो!

माझा उंट चटकन उठला आणि त्याने परत वाळवंटाचा रस्ता धरला. आता मात्र तो कुठेही थांबत नव्हता. भुलावण्या देणाऱ्या गवताकडे दुर्लक्ष करून त्याने वाळूच्या टेकड्यांमधून तडक घरची वाट धरली. आणि राखणदार कुत्र्याप्रमाणे त्याच्या शेजारून अक्बाय धावत होता. उंदरांना पकडण्याचे विचार त्याच्या डोक्यातून आता पळाले होते. आणि रात्र पडण्यापूर्वीच आम्ही चारी आजोबांकडे परतलो.

"शाब्बास पोरा! छान काम पार पाडलंस! अक्बाय, शहाणा कुत्रा आहेस!" चारी आजोबा म्हणाले.

अशा रीतीने काम चालले होते. शरद ऋतूच्या अखेरच्या दिवसांपर्यंत मी विहीरीतून पाणी आणायचे काम करीत होतो. आणि जेव्हा मी घरी परत जायला निघालो तेव्हा कुठे मला ते गुपित समजले.

मी तेथे येण्यापूर्वी, अक्बाय आणि तो उंट असे दोघेच पाणी आणण्याचे काम करीत... चारी आजोबांनी त्यांना शिकवले होते!





## धनगराची नजर

एकदा भूगोलशास्त्रज्ञांचा एक छोटा काफला काराकुमचे काळे वाळवंट ओलांडत चालला होता. त्या लोकांना अख्खा पंधरवडा त्या वाळवंटामधून अगदी एकाकी कंठावा लागला होता. नजरेला फक्त वाळू आणि उंट. अखेरीस ते किझील्यार नांवाच्या धनगरवस्तीवर जाऊन पोचले. या वस्तीत पाच धनगरांची घरे होती. त्यांपैकी तीन कझाख होते, दोन तुर्कमेनी होते.

रेपेतेक नांवाच्या प्रसिद्ध वाळवंटी राखीव अभयारण्याकडे ते भूगोलशास्त्रज्ञ चालले होते. पण अचानक त्या धनगरांच्या मेजवानीच्या वेळी तेथे हजर राहण्याचा योग त्यांना लाभला. अशा मेजवानीला धनगर लोक तोई म्हणतात. त्या दमल्याभागल्या प्रवाशांचे स्वागत करून त्यांना आपले मानून खाऊ-पिऊ घालण्यात त्या अतिथीप्रेमी धनगरांना साहजिकच खूप आनंद झाला.

चरबीयुक्त मटणाच्या शूर्पा ( मटणाचे सूप ) नांवाच्या सूपनंतर बेशबार्माक ( मटणाचा पदार्थ ) या शेवयांसकट शिजवलेल्या मटणाच्या पदार्थावर मंडळींनी यथेच्छ ताव मारला व फुरके मारून चहा पीत गप्पागोष्टी चालू झाल्या.

त्यावेळी प्रत्येकाच्या मनात दुष्काळाच्या भीतीने ठाण मांडले होते. वसंत ऋतू संपत आला होता तरी अजून पावसाचा पत्ता नव्हता. गवत सुकून भाजून गेले होते आणि त्याला मक्याचा फिकट भुरा रंग आला होता. जनावरांना खायला काय घालायचे?

"बस्स उंटिणींसारखं कण्हायचं थांबवा," एक भरडा आवाज उमटला. "मेजवानी संपायच्या वेळेस्तोवर तुम्ही सारे पावसानं भिजून ओलेचिप्प व्हाल!"

तो चारी आजोबांचा आवाज होता. रात्रीसाठी आपल्या मेंढ्यांना कोंडवाड्यात घालून आता ते आपल्या रंगीबेरंगी दुलईवर येऊन बसत होते.

"पण हे तुम्हाला कसं समजलं?" एका भूगोलशास्त्रज्ञाने विचारले. "आकाश तर अगदी स्वच्छ आहे."



"अरे माझ्या उंटाच्या बछड्या!" म्हातारा धनगर हसून म्हणाला. "तुम्ही लोक आज इथं येणार हे काल मला जेवढं पक्कं माहीत होतं, तेवढंच आता पाऊस पडणार हे मला ठाम माहीत आहे."

"चारी-आगा, तुम्ही कोडयांची भाषा बोलताय."

"मेंढीच्या ढुंगणाला शेपटी असते हे सांगण्याएवढं माझं बोलणं साधं-सोपं आहे." आपल्या प्रत्येक बोटावरची मटणाची चरबी चाटून पुसून खात म्हातारबाबा बोलले. "मेजवानीला यायला उशीर होईल या भीतीनं तुमच्या वाटखुणांवरून मी माझ्या मेंढयांना पिटाळत आणलं. ऐका माझ्या कोकरांनो, तुम्ही शाळा-कॉलेजात काही थोडी वर्ष घालवलीत, तर या वाळवंटात शिकण्यात माझं अख्खं आयुष्य गेलंय. ही काळी वाळू माझी शिक्षक. दहा वर्षांपूर्वी तुम्हा लोकांना मी माझा सर्वात चांगला उंट विकला होता आणि त्यानंच तुम्हाला आज इथं आणलं. त्याच्या पाऊल खुणा मी कुठंही ओळखतो. चेहऱ्यावरून माणसाचं वर्णन करता येतं तसं पावलांच्या खुणांवरून जनावर ओळखता येतं."

"ठीक आहे चारी-आगा," भूगोलशास्त्रज्ञ म्हणाला, "तुमचं दुसरं रहस्य सांगा. लौकरच पाऊस पडेल असं कोणत्या आधारावर तुम्ही एवढया खात्रीनं सांगता?"

"आता नक्की पाऊस पडेल. येताना वाटेत माझी मेंढरं जणू वाऱ्याला तोंड द्यावं तशी एकमेकांजवळ गर्दी करून आणि मुडचा भुईला टेकवून उभी राहिली. ही पावसाची हमखास खूण आहे."

तरीही माणसे सावध होती. सूर्य नेहमीप्रमाणेच निर्दयपणे भाजून काढत होता. आकाशात एकही ढग दिसत नव्हता किंवा त्या धुळकट वाळवंटात वाऱ्याची एकही झुळूक वहात नव्हती. पण म्हाताऱ्या धनगराचे बोलणे खरे ठरले. मेजवानी संपायच्या आतच वाळूवरून जोरदार वारे वहायला सुरुवात झाली व आकाशात वादळी ढग जमा झाले.

आणि पावसाच्या सरी कोसळू लागल्या.

भूगोलशास्त्रज्ञांचा काफला जेव्हा रेपेतेकला जायला निघाला, तेव्हा त्यांचे पाय ओल्या वाळूमध्ये रुतत होते आणि वाळवंटातल्या गवताच्या ताजेपणाकडे व डोळयांदेखत उमललेल्या फुलांकडे त्यांचे डोळे नवलाईने पहात होते.

नदीच्या वाळूसारखा त्या ओल्या वाळूला ताजा वास येत होता.





## खरा मित्र

त्या उंटाचे नाव होते बायीर-होल्म. म्हणजे पर्वताएवढा प्रचंड तो उंट खरोखरच खूप मोठा आणि ताकदवान होता.

जेव्हा तो म्हातारा झाला तेव्हा त्याच्या मालकाने त्याला टाकून दिले नाही किंवा त्याला कामालाही जुंपले नाही. त्या इमानी जुन्या सेवकाला निवांतपणे राहू देण्यात आले. पण त्या उंटाच्या डोक्यात मात्र दुसरेच विचार होते. माणसाच्या दयाळूपणाची, त्याच्या प्रेमळ थोपटण्याची, त्याच्या शब्दाची, भल्या मोठ्या केसाळ कानांना गंमतीने त्याच्याकडून ओढून घेण्याची त्या उंटाला सवय लागली होती. नुसते गप्प बसून राहणे त्याला अजिबात आवडत नव्हते.

एक दिवस एक छोटा मुलगा हातात भाकरीचा तुकडा घेऊन बायीर-होल्मजवळ आला.

"माझं नांव मुराद," तो उंटाला म्हणाला. "आणि तुझं नांव बायीर आहे ना? चल, आपण मित्र होऊ या."

मुराद आपल्या मित्राला भेटायला रोज येऊ लागला. येताना तो उंटासाठी खायला घेऊन येई आणि त्याला प्रेमाने थोपटे. दरम्यान, आपल्या छोट्या मित्राला खूप करण्यासाठी तो म्हातारा उंट जमिनीवर आडवा पसरून राही. काही वेळा तर आपल्या टेंगळेदार पाठीवरून त्याला फिरवून आणी.

मे महिन्याचे शेवटचे दिवस होते. वाळवंटातले गवत एव्हाना सुकून गेले होते. सर्पण गोळा करायला मुराद बायीरला घेऊन गेला होता. वाळवंटातल्या विरळ झुडुपांच्या काटक्यांच्या त्या वेड्यावाकड्या बांधलेल्या मोळ्या मुळीच जड नव्हत्या, पण तो उंट त्यांना एवढ्या दिमाखाने घेऊन चालला होता की, जणू तो पूर्वेमधले भारी किंमतीचे खजिनेच वाहून नेत होता. छाती पुढे काढून चालताना तो दाखवू पहात होता की, तो पुन्हा काम करीत होता आणि लोकांना मदत करीत होता.



अशाच एका भटकंतीमध्ये तो मुलगा आणि उंट एका दूरच्या झाडीजवळ पोचले. तेथे वाळलेल्या काटक्या होत्या. मुरादने भरपूर सर्पण गोळा केले. माध्यान्हीच्या तापत्या उन्हात तो मजेने काम करीत होता. पण लौकरच त्याला तहान लागली आणि उष्मा जाणवू लागला. तेव्हा



त्याला आठवण झाली की, पाण्याचा खुजा तो घरीच विसरला होता. आपल्या विसरभोळेपणाची त्याला लाज वाटली. घर खूप दूर असल्याने जवळच्याच जुन्या ताकुर मधून पाणी घेणे योग्य ठरेल असे त्याला वाटले. ताकुर म्हणजे आटलेल्या तळयाच्या जागी सूर्याच्या कडक उन्हाने भाजून

निघालेला वाळूचा बधारा. ताकुर मध्ये पाण्याचे छोटे छोटे ओहोळ असणार याची मुरादला खात्री होती.

दुरून त्याला सूर्यप्रकाशात ते आरशासारखे चमकत असलेले दिसत होते. मातीतल्या मिठामुळे त्याचा पृष्ठभाग पांढराशुभ्र दिसत होता.

प्रथम बायीरने वाळूच्या बांधाच्या दिशेने ठामपणे पाऊल टाकले, पण तो नंतर एकदम मागे सरला आणि रेसभरही पुढे सरकेना.

"चल बायीर," मुराद त्याला रागावून म्हणाला. "इथून आपलं घर खूप लांब आहे. पाणी मिळालं नाही तर आपल्या दोघांचेही फार हाल होतील."

उंटाच्या पाठीवरून उतरून तो पाण्याच्या दिशेने धावला असता, पण बायीरने त्याचा सदरा आपल्या दातांमध्ये गच्च पकडून धरला.

"आज काय तुला गंमत करायची लहर आलीय!" मुराद उद्गारला. "मला फक्त पाणी प्यायचंय. भयंकर गरम होतंय."

बायीरने त्याचे ऐकले नाही.

भाजलेल्या पिठाप्रमाणे पायाखालची वाळू मऊ भुसभुशीत झालेली होती. पण आपली तहान कशी लौकर भागवायची एवढयाच विचाराने त्या मुलाला घेरले होते. पाण्याची विहीर डझनभर पावलांच्या अंतरावर होती. बायीरच्या पकडीतून हिसका मारून त्याने स्वतःला सोडवून घेतले आणि जमिनीवर उडी मारली... आणि ताबडतोब गुडघ्यापर्यंत त्याचे पाय वाळूत रुतले. त्याने खूप जोराने प्रयत्न केले, पण मिठी घालणाऱ्या वाळूमधून त्याला आपले पाय वर खेचता येईनात. आपण हळूहळू वाळूत बुडत चाललो आहोत ही भयंकर जाणीव त्या मुलाला झाली. वाळू त्याला खाली खाली ओढत होती. आपल्या पोटावर पालथे पडायचा त्याने प्रयत्न केला, पण ती धोकेबाज वाळू एकदम बाजूला सरली आणि तिच्या फटींमधून पाणी झिरपले.

"बायीर ऽऽ" घाबरून मुराद ओरडला.

त्या म्हाताऱ्या उंटाला या संकटाची आधीच कल्पना होती. सरकणाऱ्या वाळूवरून त्याने लटपटती पावले टाकली, मग आपल्या पोटावर तो खाली बसला आणि धडपडणाऱ्या मुलाच्या दिशेने सरपटत सरकला.

उंटाच्या वजनाखाली वाळू खाली दबत चालली होती, तरी बायीर जास्तीत जास्त मुरादच्या जवळ सरकला, आपल्या बळकट दातांमध्ये त्याने त्याचा सदरा धरला आणि जोरात झटका देऊन त्याने मुरादला त्या वाळूच्या पकडीतून मोकळे केले. ऐन मोक्याच्या वेळी मुराद त्या दलदली वाळूमधून निसटला आणि भस्सदिशी तो खड्डा वाळूने बुजून गेला.

मरादने आपल्या मित्राला मिठी मारली. त्या उंटाच्या विचित्र डोक्याला कृतज्ञतेने त्याने आपले डोके घासले.

"बायीर, मला क्षमा कर," आपल्या शहाण्या म्हाताऱ्या मित्राची त्याने विनवणी केली. "आता इथून लौकरात लौकर निसटून जाऊ या."

उंटाने मुरादकडे कष्टी, प्रेमळ नजरेने पाहिले, पण तो जागचा हलला नाही. तेव्हा कुठे मुरादच्या ध्यानात आले की, वाळूने उंटाला मिठी घातली होती आणि लौकरच तिने बायीरला सबंध गिळून टाकले असते.

"बायीर, अरे मित्रा घाबरू नको. जरा दम धर!" मुराद ओरडला आणि चपळाईने त्याने उंटाच्या पाठीवरची वाळक्या काटक्यांची मोळी सोडवून त्या काटक्या भराभरा उंटाच्या

पोटाखाली घातल्या. मागे वळूनही न पाहता, घरून मदत आणण्यासाठी जेवढ्या वेगाने पळता येईल तेवढा तो पळत सुटला.

अनेक वेळा तो वाळवंटातल्या भाजत्या वाळूवर कोसळला. जेव्हा त्याच्या पायातली ताकद नाहीशी झाल्यासारखी होत होती तेव्हा मधून मधून तो सरपटत जात होता. ती दलदलीची वाळू त्याची वाट पहात राहणार नाही या विचाराने तो पुढे पुढे धावत होता–त्याला आपल्या मित्राला वाचवलेच पाहिजे होते.

अगदी गलितगात्र अवस्थेत तो तंबूपाशी पोचला, तंबूची कनात त्याने फाडकन उघडली आणि घोगऱ्या आवाजात तो पुटपुटला,

"बायीरला वाचवा, त्यानं मला वाचवलंय..."

एवढे बोलून अतिश्रमांमुळे तो बेशुद्ध पडला.

तो मुलगा शुद्धीवर आला तेव्हा सकाळ उजाडली होती. पण त्याच्या शुश्रूषेला अवतीभवती कुणीच नव्हते. प्रत्येकजण आपापल्या रोजच्या कामाला निघून गेला होता.

"बायीर!" एकदम उठून उभे राहताना त्या मुलाला आठवण झाली. त्याचे पाय लटपटत होते. डोके गरगरत होते, पण कसाबसा तो तंबूबाहेरच्या मोकळ्या हवेपर्यंत पोचला.

आणि तिथे तंबूबाहेर, बायीर समाधानाने गवताचा घास चघळीत होता.

मुलाला पाहताच त्या म्हाताऱ्या उंटाने चघळणे थांबवले आणि आपले डोके बाजूला फिरवले. किती मजेदार दिसत होता तो! त्याच्या तोंडाच्या दोन्ही बाजूंनी गवत डोकावत होते, जणू त्याला मिशा उगवल्यासारख्या दिसत होत्या.

मुरादच्या डोळ्यात समाधानाचे आणि आनंदाचे अश्रू होते.





## धनगराचे जीवन

कूलीचे वडील याझखान हे धनगर होते; आणि त्यांचे वडीलही धनगर होते व त्या वडिलांचे वडीलही धनगर होते...

आपल्या वाकड्या सोटयावर रेलून एखाद्या वाळवंटातल्या झाडासारखा कूली स्तब्ध उभा होता. वाळूमध्ये ती एखाकी आकृती एकाद्या उंच सुळक्यासारखी भासत होती. दूरवर टेकड्यांपलिकडे सायंकाळचा थकलाभागला सूर्य ओठंगला होता. सूर्याने आणि धनगराने एकमेकांना चांगले समजून घेतले होते. अखेरीस त्यांचे दैनंदिन जीवन सारखेच होते.

कूलीच्या पलिकडे त्याच्या मेंढ्या होत्या. त्या दीड हजार मेंढ्या वाळवंटातल्या कुरणात चरत होत्या. एकटा कूली आणि साकार व बासार नांवाचे त्याचे दोन कुत्रे त्या मेंढ्यांची राखण करीत. सूर्य जरी आता क्षितिजावर मावळला होता तरी आगीत केस जळल्यानंतर येतो तसा भाजका वास वाळूला अजूनही येत होता.

त्या उन्हाळ्यात कूली सुकून गेला होता आणि रापला होता. पण त्याबद्दल त्याच्या काही तक्रारी नव्हत्या. ना सूर्याबद्दल, ना वाऱ्याबद्दल, ना वादळाबद्दल त्याची तक्रार होती. त्याचे जीवनच तसे होते. दात गच्च आवळून धरायचे आणि वाळूच्या व बर्फाच्या वादळांना तोंड द्यायचे, मुसळधार वासंतिक पावसाच्या धारा झेलायच्या आणि लांडग्यांच्या भयानक आरोळ्या ऐकायच्या...

सकाळी नऊ वाजता कूली आपल्या जनावरांना पाणी पाजायचा; मग दुपारची ऊन्हे निवेपर्यंत मेंढ्या, कुत्रे आणि तो विश्रांती घेत गप्प पडून रहात. एकदा का सूर्य दूरच्या टेकड्यांवर घसरला की, सेर्काच्या गळ्यातली घंटा कळपाला दचकवून एकदम जाग आणायची.

अशा प्रकारे आता कूली त्या घंटेची किणकिण ऐकायची वाट पहात होता. ती वाजायला लागताच सेर्का कळपाला गोळा करू लागला, कारण आता चांगलेचुंगले खायला मिळणार हे त्याला

वाहीत होते. मेंढरे खाणे खायला आली. कूली त्यांच्या पाठोपाठ काही अंतरावर चालत गेला, मग थांबला आणि आपल्या वाकड्या सोटचावर रेलून सूर्यास्त पाहू लागला. केशरी सूर्यकिरणांनी त्या धनगराला एकदा शेवटचे डोळे मिचकावून दाखवले आणि विश्रांतीसाठी ती बुडून गेली. सूर्य विश्रांतीला गेला, पण कूलीचे काम आत्ता कुठे सुरू झाले होते.

"उद्या सकाळी भेटू," कूली सूर्याला उद्देशून म्हणाला.

सबंध दिवसात त्याच्या तोंडून एवढेच शब्द उच्चारले गेले होते.

मैदानावर काळोख पसरत गेला. आणि जेव्हा आकाशालाही त्या काळोखाने वेढले तेव्हा आनंदी चंद्र उगवला. आपल्या भेदक नजरेने त्याने अंधाराला बाजूला सारले आणि उंदरांच्या ढिगांवरून त्याच्या सावल्या झरझर पसरत वाळूत वितळून गेल्या.

जेव्हा चंद्र टेकड्यांपासून वर गेला तेव्हा कूलीने मेंढ्यांमधून आपले खेचर बाजूला काढलें आणि त्याच्या गळ्याभोवती घंटा बांधली. ते खेचर त्यांचे जेवण आणि पाणी वाहून आणत असे. जर रात्रीच्या वेळी चुकून ते इकडेतिकडे भटकत राहिले असते, तर कूली आणि इतर जनावरे भुकेली व तहानेली राहिली असती.

अखेरीस वाळवंटातली उष्णता निवली आणि थंडीच्या लाटेने वाळवंटाला वेढून टाकले. चांदण्यात न्हाऊन निघणाऱ्या टेकड्या दुधाळ धूसर भासत होत्या. मैदानात चांदणे एवढे लख्ख पडले होते की, पायांखालचे वाळूचे कण हिमकणांसारखे चमकत होते.

मेंढरे विनधास्तपणे चरत होती.

कूलीच्या पायाशी बसलेल्या कुत्र्यांनी आपल्या दमलेल्या पंजांवर डोकी टेकली होती. त्यांनी डोळे मिटून घेतले होते तरी जरासे खुट्ट होताच वाऱ्याने पाने फडफडावीत तसे त्यांचे कान अस्वस्थपणे थरथरत. सारे काही शांत निवांत भासत होते. त्या रात्री कुणाही लांडग्याला कळपावर हल्ला करायची हिंमत झाली नसती.

मेंढ्या चोरायला मोठे कसब लागते. मेंढ्या कमालीच्या संवेदनाक्षम असतात, भेदरट असतात. जर लांडग्यांनी सरळ हल्ला चढवला तर त्या पटकन त्यांच्या आधीन होतात. जर लांडगे मागून लपतछपत आले तर त्यांना धनगराला तोंड द्यावे लागते. आणि दोन्ही बाजूंनी कुत्रे राखण करीत असतात – उजवीकडून साकार व डावीकडून बासार.

मेंढ्या चरत होत्या, कुत्री स्वप्ने पहात होती आणि धनगर उंच आकाशातल्या चंद्राकडे टक लावून पहात होता. कुठूनतरी हळूच वाऱ्याची झुळूक आली. त्या निस्तब्ध, निवांत, चांदण्यातल्या देखाव्याला पाहून काळजात हलके हलके वाटत होते.

मध्यरात्रीला मेंढ्या चरायच्या थांबल्या आणि थंडगार वाळूवर विश्रांती घ्यायला मोकळ्या मैदानात एकत्र गोळा झाल्या. कूलीने खेचराच्या पाठीवरून खाण्या-पिण्याच्या जिनसा उतरवून ठेवल्या. अनेक वाळक्या काटक्या मोडून त्यांचा ढीग बनवला आणि शेकोटी पेटवली. मग त्याने तांब्याच्या किटलीत पाणी ओतले व आगीवर पाणी उकळायला ठेवले. रबराच्या भांड्यात आपल्या कुत्र्यांसाठी त्याने थोडे पाणी ठेवले. साकार उठून आपले पाणी प्यायला, बासार तसाच कलंडून पडून राहिला.

शेकोटी छोटी होती तरी तिच्या प्रकाशाने डोळे दिपून जात होते. धनगराने आगीच्या जवळ पसरलेल्या आपल्या हातांनी डोळ्यांवर आडोसा धरला होता. त्याच्या बधीर शरीरामधून उष्णतेची ऊब हळूहळू पसरत चालली होती. त्याच्या तांब्याच्या तुंच (चहाचे भांडे) मध्ये जेव्हा



पाणी उकळले तेव्हा कूलीने चांगला कडक चहा बनवला. कडक चहा चांगली ताकद देतो असे त्याचे मत होते.

त्या आगीपासून सुमारे दहा पावले दूर अंतरावर उभे राहून, केसाळ अंगरख्यात गुरफटून बसलेला कूली तो गरम चहा पीत होता. आगीजवळ फार काळ बसून राहणे धोक्याचे असते. वाळवंटातले सगळे सरपटणारे प्राणी आगीकडे आकर्षित होतात – वाळवंटातले कोळी, कांगारूसारखे प्राणी काळे किडे. प्राणघातक विंचू तर सरळ आगीच्या दिशेने चालत येतो आणि त्याची विषारी नांगी डंख मारायला नेहमी तयार असते.

कूलीने आपले चहाचे पहिले भांडे परत किटलीत ओतले. चहा चांगला मुरायला पाहिजे होता. तो मुरल्यावर त्याने पुन्हा भांड्यात चहा ओतला व नंतर त्याने चहाची अनेक भांडी

पोटात रिचवली. त्यामुळे त्याची थंडी आणि तहान पळाली व त्याच्या नसांमधून ऊबदार रक्त वाहू लागले.

आगीने शेवटच्या वाळक्या काटक्या लपेटल्या आणि भोवतालच्या इतर सर्व गोष्टींप्रमाणे ती स्तब्ध झाली. चांदणेसुद्धा मलूल भासू लागले. तारे चमकू लागले, कुत्री भोवती फिरू लागली, कळप डुलकी घेत होता.

कूलीने आपला वाकडा सोटा डोक्याखाली घेतला होता. वाकडा सोटा म्हणजे धनगराची लोखंडी उशी. त्या उशीवर आडवे पडून तो पुन्हा एकदा आकाशाकडे निरखून पाहू लागला. आकाशात ध्रुव तारा चमकत होता, सप्तर्षि हळूच रात्रीच्या अंधारात चोरपावलांनी येत होते. पहाटेच्या वेळी ध्रुव ताऱ्याला मागे सारून पूर्वेला शुक्राची चांदणी चमकू लागली असती. आणि मग टेकड्यांवर सारा नक्षत्रगण चमकू लागला असता.

ताऱ्यांची वाटचाल कशी वाचायची ते कूलीला त्याच्या वडिलांनी शिकवले होते. जरी लिहीता-वाचता येत नव्हते तरी म्हाताऱ्या याझखानना एखाद्या खगोलशास्त्रज्ञासारखी आकाशाची माहिती होती. एकदा त्यांनी आपल्या मुलाला सांगितले होते:

"ऐक माझ्या पोरा, जर वाळवंटात तुला जायचं असेल, तर तुझ्या तळहाताप्रमाणं तुला ते माहिती पाहिजे. आणि आपल्या पाच बोटांसारखी तुला आकाशाची माहिती असली पाहिजे. आकाश माहिती असल्याशिवाय तुला वाळवंट समजणार नाही."

आणि कूली आकाशाशी व वाळवंटाशी नेहमी एकरूप होऊन राहिला. त्याच्या एकाकी धनगरी जीवनात आकाश आणि वाळवंट त्याचे सतत साथीदार होते.



